विभागीय वन अधिकारी गट-अ (वरिष्ठ श्रेणी)
संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-०४.२३/प्र.क्र.६६ /फ-८.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ जून, २०२३

**शासन आदेश :-**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने विभागीय वन अधिकारी,गट-अ (वरिष्ठ श्रेणी) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या खालीलप्रमाणे करण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | अधिका-याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. अशोक मधुसूदन सामक, विभागीय वन अधिकारी, वनसंपत्ती सर्वेक्षण घटक, गडचिरोली | विभागीय वन अधिकारी (योजना),पुणे वनवृत्त, पुणे | रिक्त पदी |
| २ | श्रीमती स्नेहल मिलिंद पाटील, विभागीय वन अधिकारी, कक्ष-४ (रोहयो) नागपूर प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालय नागपूर | विभागीय वन अधिकारी, (वन्यजीव) वन्यजीव विभाग, पुणे. | रिक्त पदी |
| ३ | श्री. मोहन के. गोखले, विभागीय वन अधिकारी (कॅम्पा) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबलप्रमुख) म.रा. यांचे कार्यालय | विभागीय वन अधिकारी (प्रादेशिक) हिंगोली. | रिक्त पदी |

२. सदर नियुक्ती / पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, संबंधित अधिकाऱ्याला नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास ananda.shendge@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत कळवावे.

३. संबंधित अधिकाऱ्याला शासनाच्या पूर्वपरवानगी शिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधित अधिकाऱ्याला मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

४. सदरहू बदली आदेशानुसार संबधित अधिकारी तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारे असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

**५.** सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०६२८२०५२५७१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANANDA SHANKAR SHENDAGE

Digitally signed by ANANDA SHANKAR SHENDAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, pseudonym=F47821202A3D8C06F80E6240CB6E122AFEEDD6F5, serialNumber=DCED31BA3BA0E455430F67304905C6E3544DAE39602268D4CF2844818A1F80A4, cn=ANANDA SHANKAR SHENDAGE
Date: 2023.06.28 20:54:01 +05'30'

**( आनंदा शेंडगे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९) मुख्य वनसंरक्षक /वनसंरक्षक / उप वनसंरक्षक (सर्व)
१०) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र -१/२, मुंबई/ नागपूर
११) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१२) प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१३) संबंधित अधिकारी (प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत)
१४) निवड नस्ती (फ-८ कार्यासन).